श्री सिद्धिविनायक गणपती मंदिर न्यासातर्फे राबविण्यात येणाऱ्या "श्रीसिद्धिविनायक न्यास पुस्तक पेढी योजनेंतर्गत विविध विभागांसाठी वाढीव तरतूद करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## विधी व न्याय विभाग

## शासन निर्णय क्रमांक : एसव्हीटी १११८/१३८५/प्र.क्र.१४४/का.१६

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०७ सप्टेंबर, २०१८.

वाचा: १) शासन पत्र,विधि व न्याय विभाग क्र.एसव्हीटी २००५/३३०/प्र.क्र.३६/का.१६,दि.१६.९.२००९
२) कार्यकारी अधिकारी, श्रीसिद्धिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई यांचे पत्र क्र.सिविगमं/५५६/२०१८, दिनांक १६.०८.२०१८.

**प्रस्तावना :**

श्री सिद्धिविनायक गणपती मंदिर न्यासातर्फे आर्थिकदृष्ट्या गरीब व गरजू विद्यार्थ्यांकरिता सुरु करण्यात आलेली पुस्तक पेढी योजना कायमस्वरुपी सुरु करण्यास संदर्भाधीन क्र.१, दिनांक १६.०९.२००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.सन २०१७-१८ पासून ही योजना ऑनलाईन पध्दतीने सुरु करण्यात आली आहे. सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षासाठी एकूण ६ महसूली विभागांसाठी एकूण रु.२ कोटी ४० लक्ष इतकी तरतूद मंजूरी करण्यात आली होती. मुंबई विद्यापीठाने १५ वी वाणिज्य शाखेचा अभ्यासक्रम बदलल्यामुळे १५ वी वाणिज्य शाखेच्या पाचव्या व सहाव्या सत्राची नवीन पुस्तके खरेदी करणे आवश्यक आहे. यावर्षी न्यासाकडे पुस्तकांच्या मागणीची वाढ झाली आहे. त्यामुळे सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षात मंजुर केलेल्या तरतुदीपेक्षा या वर्षाच्या तरतुदीत वाढ करण्याची विनंती न्यासाकडून झाली असून सदर विनंतीस अनुसरुन शासनाद्वारे खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :

श्रीसिद्धिविनायक गणपती मंदिर न्यासातर्फे राबविण्यात येत असलेल्या श्रीसिद्धिविनायक न्यास पुस्तक पेढी योजनेच्या संदर्भाधिन शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या तरतुदीमध्ये सुधारणा करून विविध विभागांसाठी पुढीलप्रमाणे तरतूद करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | विभागाचे नांव | सन २०१७-१८ साठी तरतूद | सन २०१८-१९ साठी वाढीव तरतूद |
|---|---|---|---|
| १. | मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे | रु.१ कोटी | रु.१ कोटी २५ लाख |
| २. | उर्वरित कोकण (पालघर, रत्नागिरी, रायगड, सिंधुदुर्ग) | रु.२५ लक्ष | रु.२५ लक्ष |
| ३. | पश्चिम महाराष्ट्र (पुणे, सांगली, सातारा, कोल्हापूर, सोलापूर) | रु.५० लक्ष | रु.५० लक्ष |
| ४. | मराठवाडा (औरंगाबाद, जालना, बीड, उस्मानाबाद, परभणी, लातूर,हिंगोली, नांदेड) | रु.१५ लक्ष | रु.२० लक्ष |
| ५. | विदर्भ (नागपूर, चंद्रपूर, वर्धा, भंडारा, गडचिरोली, अमरावती, बुलढाणा, वाशिम, अकोला, यवतमाळ, गोंदिया) | रु.२५ लक्ष | रु.२५ लक्ष |
| ६. | उत्तर महाराष्ट्र (नाशिक, अहमदनगर, नंदूरबार, धुळे, जळगांव) | रु.२५ लक्ष | रु.२५ लक्ष |
| | **एकूण :** | **रु.२ कोटी ४० लक्ष** | **रु.२ कोटी ७० लक्ष** |

२. कार्यकारी अधिकारी, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास यांनी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाच्या अंती गत वर्षात शिल्लक राहिलेली पुस्तके, विद्यार्थ्यांनी परत केलेली पुस्तके व न्यासाने नवीन खरेदी केलेली पुस्तके तसेच खर्ची पडलेल्या एकूण निधीचा विस्तृत तपशिल शासनास सादर करणे बंधनकारक राहिल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८०९१११६०५५३२२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2018.09.11 16:10:31 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. अध्यक्ष, श्रीसिद्धिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई,
४. कार्यकारी अधिकारी, श्रीसिद्धिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई,
५. निवड नस्ती.